सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांना राजयस्तरीय तथा विभागीय आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्रामार्फत प्रशिक्षण देण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः पुरमा-२०२५/प्र.क्र.२/क्षमता बांधणी

गो.ते.रुग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक : १२ जून,२०२५.

**वाचा :- संचालक, राज्य आरोग्य व कुटुंब कल्याण संस्था, नागपूर यांचे पत्र क्रमांक : राआवकुकसं/ पुरवणी मागणी/९०२०-३०/२५, दि. २५.०५.२०२५**

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन दिनांक २५.०५.२०२५ च्या पत्रान्वये, संचालक, राज्य आरोग्य व कुटुंब कल्याण संस्था, नागपूर यांनी सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत राज्यस्तरीय तथा विभागीय आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्रामार्फत आयोजित करण्यात येणारे विविध संवर्गाचे प्रशिक्षण सत्राकरीता येणाऱ्या खर्चासाठी संबधित प्राचार्य यांना अतिरिक्त निधी उपलब्ध करून देण्याबाबत विनंती केलेली आहे.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या विभागांतर्गत राज्यस्तरीय तथा विभागीय आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्रामार्फत आयोजित करण्यात येणारे विविध संवर्गाचे प्रशिक्षण सत्राकरीता येणाऱ्या खर्चासाठी अंतर्गत रु.१२,४५,००,०००/- (अक्षरी रु. बारा कोटी पंचेचाळीस लक्ष ) इतके अनुदान उपलब्ध करुन देण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च मुख्य लेखाशीर्ष २२११०१०२, ००३-प्रशिक्षण (०१) कुटुंब कल्याण प्रशिक्षण, (०१) (०१) प्रादेशिक कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) (कार्यक्रम) अंतर्गत सन २०२५-२६ च्या द्वितीय अधिवेशनात मंजूर होणाऱ्या पुरवणी मागणीद्वारे प्राप्त होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१२१०१६५०३९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2025.06.12 10:17:28 +05'30'

**(अ.भि.मोरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/ २, मुंबई/ नागपूर.
२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३) संचालक (१), आरोग्य सेवा, मुंबई.
४) संचालक,राज्य आरोग्य व कुटुंब कल्याण संस्था,नागपूर
५) प्राचार्य कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र, नागपूर,अमरावती,कोल्हापूर,नाशिक,पुणे, छत्रपती संभाजीनगर,ठाणे,
६) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,अमरावती,कोल्हापूर,नाशिक,पुणे, छत्रपती संभाजीनगर,ठाणे,
७) **निवडनस्ती (क्षमता बांधणी** ).